**परिवहन विभागाच्या संकेतस्थळाचे देखभाल-दुरुस्ती करण्याकरीता मे. महा ऑनलाईन लि. यांना आवश्यक असणारे तांत्रिक मनुष्यबळ बाह्यस्रोताद्वारे उपलब्ध करुन घेण्यास व त्यावरील मानधन अदा करण्याकरीता येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१११८/प्र.क्र.२४२/परि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २४ जानेवारी २०२२

**वाचा : -**

१) सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, शासन पत्र क्र.मातंसं-२०१८/प्र.क्र.५०/एस-२/ ३९, दिनांक ०५.०४.२०२१.

२) महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ लि. यांचे पत्र दिनांक २०.०४.२०२१.

३) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पआाका/का.११/ वेबसाईट/ दे. व दु./२०२१/ जा.क्र. १४६१९, दिनांक०२.१२.२०२१.

**प्रस्तावना :-**

मे. महा ऑनलाईन लि. यांनी परिवहन विभागाचे www.transport.maharashtra.gov.in हे संकेतस्थळ दि.०३.०२.२०१७ पासून विकसित केले आहे. सदर संकेतस्थळाचा वापर देशभरातून होत असून, या संकेतस्थळावरुन विभागाबद्दल सर्व माहिती, नियम, नमूने, महत्वाचे निर्णय इ. माहिती नियमितपणे प्रदर्शित करण्यात येते. सदर संकेतस्थळ सुरळीतपणे कार्यान्वित असून, पुढे सदर संकेतस्थळासंदर्भात काही तांत्रिक अडचणी उद्भवू नये, याकरीता सदर संकेतस्थळाची देखभाल व दुरुस्ती करणे आवश्यक आहे. त्याकरीता उपर्निर्दिष्ट क्र. ३ येथील परिवहन आयुक्तालयाच्या प्रस्तावानुसार, सदर संकेतस्थळाचे विकासक मे. महा ऑनलाईन लि. यांना संकेतस्थळ देखभाल, नवीन बाबींचा समाविष्ट करणे इ. करीता बाह्यस्रोताद्वारे एक सॉफ्टवेअर विकासकाची (Software Developer) ०१ वर्षाकरीता नेमणूक करणे व त्यावरील येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

परिवहन विभागाचे www.transport.maharashtra.gov.in या संकेतस्थळाचे तांत्रिक मनुष्यबळाद्वारे देखभाल-दुरुस्तीकरीता मे. महा ऑनलाईन लि. यांना आवश्यक असणारे तांत्रिक मनुष्यबळ म्हणून बाह्यस्रोताद्वारे एक सॉफ्टवेअर विकासकाची (Software Developer) ०१ वर्ष

इतक्या कालावधीकरीता नेमणूक करणे व त्यावरील येणारा खर्च तसेच सेक्युरिटी ऑडीट (Security Audit) साठी लागणारी रक्कम याकरीता खालील तपशिलात नमूद केल्यानुसार येणाऱ्या एकूण रु. ३,१८,५८८/- (अक्षरी रुपये तीन लाख अठरा हजार पाचशे अठ्ठ्याऐंशी फक्त) इतक्या खर्चास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रस्तावाचा तपशिल खालीलप्रमाणे आहे:-

| **तपशिल** | **एकूण कालावधी** | **एका महिन्याचे मानधन** | **एकूण खर्च** |
|---|---|---|---|
| सॉफ्टवेअर विकासक (२ वर्ष अनुभव) | १२ महिने | ७३,३३०.०० | २,१९,९९९.००<br>(७३,३३०x १२ महिने) |
| सुरक्षा लेखापरीक्षण (Security Audit) | | | ५०,०००.०० |
| Total | | | **२,६९,९९०.००** |
| | | (+) १८% GST | **४८,५९८.००** |
| **करासहीत एकूण रक्कम** | | | **३,१८,५८८.००** |

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभागाच्या दिनांक ०५.०४.२०२१ तसेच महाराष्ट्र माहिती तंत्राज्ञान महामंडळ लि. यांचे दिनांक २०.०४.२०२१ रोजीच्या पत्रांन्वये प्रत्येक महिना प्रत्येक व्यक्तीसाठी विहीत केलेल्या मासिक दराने (करांव्यतिरिक्त) त्यात नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च हा "मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनांवरील कर (०१) (०४) कार्यालयीन अभिलेख्यांचे संगणकीकरण (मोटार वाहन आणि मोटार अपघात दावा न्यायाधिकरण) (कार्यक्रम) (२०४१ ०२९७), १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर निधीतून करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, दिनांक १७.०४.२०१५ (सुधारीत) मधील वित्तीय नियम भाग-पहिला, उपविभाग-चार मधील अनुक्रमांक ११ नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१३१५४९०४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LANGHI
BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559,
pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4,
serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2022.01.24 13:18:59 +05'30'

**(भ. रा. लांघी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
३) महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर.
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) परिवहन उप आयुक्त (प्रशासन/निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती (परि-४).